प्रधानमंत्री आवास योजना(नागरी) अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०४/गृनिधो-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ फ़ेब्रुवारी, २०२२

**वाचा : गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, केंद्र शासन यांचे मंजूरी आदेश क्रमांकः-**
१. N-11012/48/2018/HFA-IV-UD/EFS-9044101, Dt. 7th December, 2018.
२. गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, केंद्र शासन क्र. N-11012/48/2018/HFA-IV-UD, Dt. 6th April, 2021.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या, वाचा क्रं.१ येथील मंजूर आदेशान्वये एकूण रुपये ३,५२,३३,३७० इतका निधी प्रधानमंत्री आवास योजना ( शहरी ) अंतर्गत केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून मंजूर झाला आहे. तथापि, सदर निधी सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाने मंजूर केला असल्यामुळे सदर निधी पुनर्जिवित करण्याचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास केंद्र शासनाने वाचा क्र. २ येथील पत्रान्वये मंजूरी दिली आहे. त्यानुसार सदर निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणाना प्रदान करण्यासाठी सुकाणू अभिकरण म्हणजे महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रधानमंत्री आवास योजना ( नागरी ) अंतर्गत केंद्र शासनाच्या संदर्भिय क्र. १ येथील आदेशामध्ये नमूद करण्यात आलेल्या अंमलबजावणी यंत्रणाना सदर आदेशात मंजूर केल्यानुसार एकूण रुपये ३,५२,३३,३७०/- इतका निधी वितरित करावयाचा आहे. सदर निधी अंमलबजावणी यंत्रणांना वितरित करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास (म्हाडा) रुपये ३,५२,३३,३७०/- (अक्षरी तीन कोटी बावन्न लक्ष तेहत्तीस हजार तीनशे सत्तर फक्त) इतका निधी यान्वये मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर निधी मागणी क्र. क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, (०८) सर्वांसाठी गृहनिर्माण (०८) (०१) सर्वासाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष २२१६२९९६ अंतर्गत वितरित करण्यात येत आहे.

३. सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व

लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनाकरिता खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०५/व्यय-३, दिनांक०५.१.२०२२ नुसार निर्गमीत करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२५१५०११८४१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2022.02.25 15:03:19 +05'30'

**( राजु अंबाडेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. अभियान संचालक, राज्य अभियान संचालनालय (प्रआयो), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४. संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपालिका.
५. संबंधित कोषागार अधिकारी.
६. उप सचिव,वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. सह संचालक, लेखा व कोषागरे कॉम्पुटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, (अर्थ),गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती/ गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.